**वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय अंतर्गत संस्थेत Student Life Cycle Management System (SLCMS) प्रणाली कार्यान्वित करण्यास मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-०६२४/प्र.क्र.२५८/प्रशा-२**

९ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
नविन गो.ते. संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१
तारीख: १४ फेब्रुवारी, २०२५

वाचा -

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दिनांक १७.०४.२०१५
२) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय यांचे पत्र क्र. डीएमईआर-११०२२/६/२०२४-सीईटीआयटी, दिनांक ३०.०५.२०२४
३) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय यांचे पत्र क्र. डीएमईआर-११०२२/६/२०२४-सीईटीआयटी, दिनांक २५.११.२०२४

**प्रस्तावना:-**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील राज्यामध्ये २५ शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, ३ दंत महाविद्यालय, ५ परीचर्या महाविद्यालय, १ व्यावसोपचार व भौतिक महाविद्यालय (OT PT), ६ आयुर्वेद महाविद्यालय आणि १ होमिओपॅथी महाविद्यालय आजमितीस कार्यरत आहेत. सदर महाविद्यालयांमध्ये MBBS, PG, Superspeciality, BDS, BAMS, BHMS, भौतिक व व्यावसोपचार महाविद्यालय (OT PT), Nursing, Paramedical इत्यादी विविध प्रकारच्या अभ्यासक्रमाकरिता विद्यार्थी प्रवेशित होतात.

सदर विद्यार्थी प्रवेशित झाल्यापासूनचे जीवनचक्र आजमितीस शासकीय संस्थांमध्ये उपलब्धतेकरीता असंख्य अडचणी येतात, त्यामुळे शासकीय संस्थांमधून उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना भविष्यात महाविद्यालयाकडून विविध प्रमाणपत्रे, दस्ताऐवज प्राप्त होण्यास अडचणी संभवतात अशा स्थितीत विद्यार्थी दैनंदिन व मुलभुत गरजापासुन वंचित राहतात व त्यांना वारंवार प्रशासनाकडे विनंती अर्ज सादर करावे लागतात. विद्यार्थी वर्गांना विविध माहिती व शैक्षणिक उपक्रमाशी निगडीत अनुषंगिक बाबी विनाविलंब आवश्यकतेनुसार उपलब्ध व्हावे याकरिता एक ठोस कार्यप्रणाली विकसित करण्याची आवश्यकता आहे. संचालनालयाने दिनांक ३०.०५.२०२४ रोजीच्या पत्रान्वये C-DAC ह्या शासन अंगीकृत कंपनीने विकसित केलेले Student Life Cycle Management System (SLCMS) आज्ञावलीचा वापर वैद्यकीय शिक्षण विभागाच्या अधिपत्याखाली सर्व शासकीय वैद्यकीय, दंत, आयुर्वेद, नर्सिंग, होमियोपॅथी व भौतिक व व्यावसोपचार महाविद्यालयांमध्ये सुरु करण्यास मान्यता मिळण्याची विनंती शासनास केली आहे. त्यानुसार

विभागाच्या अधिपत्याखालील संस्थेत Student Life Cycle Management System (SLCMS) प्रणाली राबविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखाली सर्व शासकीय वैद्यकीय, दंत, आयुर्वेद, नर्सिंग, होमियोपॅथी व भौतिक व व्यावसोपचार महाविद्यालयांमध्ये C-DAC ह्या शासन अंगीकृत कंपनीने विकसित केलेले विद्यार्थी जीवनचक्र व्यवस्थापन प्रणाली (Student Life Cycle Management System) प्रणाली कार्यान्वित करण्यास तसेच त्यासाठी दोन वर्षासाठी येणा-या रुपये ३,८२,३४,०००/- (जी.एस.टी. शिवाय) एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

प्रकल्पात समाविष्ट बाब निहाय खर्च खालीलप्रमाणे आहे.

| **सदर प्रकल्प दोन वर्षासाठी राबविण्याकरीता येणा-या खर्चाचा तपशिल (रक्कम लाखात)** | | | |
|---|---|---|---|
| Part १ | Capex Costing | Year -१ | |
| Sr. No. | Essential Software Components | Amt (INR LAKHS) | |
| A.१. | Software Customization and Maintenance Including Mobile Apps | | |
| A.१.१. | Student Life Cycle Management (SLCMS) Software Support & Upgradation, Configuration. | १००.०० | |
| A.१.२. | SLCMS Mobile Application Development, Integration. | २०.०० | |
| A.२ | Safe to Cost Certification | ३.०० | |
| A.३. | Project Adminstration Cost @CDAC | २०.०० | |
| A.४. | One Time Online/Off Line Training of all modules in ४ batches in ८ Working days having maximum of २५ master trainers/batch @ ३८५००/- per batch. | १.५४ | |
| A.५. | Data Center Hosting, Platform Management and EDB Support Subscriptions | १९.०३ | |
| A.६. | One SLCMS Implementer at DMER (@ ०.७५ lacs/month) | ९.०० | |
| A.७. | Project Overhead Cost (१०% of A.१.) | १२.०० | |
| A.८. | Onboard Charges of MCH on SLMS Platform After POC (one time) Per MCH @ १.०० Lacs | ६५.०० | |
| | Total Capex Cost (Exclusive of GST) | **२४९.५७** | |
| Part २ | Opex Cost | Year १ | Year २ |
| B.१. | Software Customization and Maintenance Including | | ५०.६० |

| | | | |
|---|---|---|---|
| | Mobile Apps | | |
| B.१.१. | Student Life Cycle Mangement (SLCMS) Software Support and Upgradation, Configuration | | |
| B.१.२. | SLCMS Mobile Application Development, Integration | | |
| B.२. | Safe to Cost Certification | | ३.०० |
| B.३. | Project Adminstration Cost @ CDAC | | २२.०० |
| B.४. | Data Center Hosting, Platform Management and EDB Support Subscriptions. | | २०.९३ |
| B.५. | One SLCMS Implementer at DMER (@०.७५ lacs/month) | | ९.९० |
| B.६. | Project Overhead Cost (१०% of A.१.) | | ५.०६ |
| B.७. | Operational Support Charges of New Students Registration on SLCMS System (७०९१ Seats in Various Courses @ Rs. ३००/- per Student of ६५ Medical College) | | २१.२७ |
| | **Total OPEX Cost (Exclusive of GST)** | | **१३२.७७** |
| | **Total (CAPEX + OPEX) (Exclusive of GST)** | **३८२.३४** | |

२. सदर प्रकल्पांतर्गत शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग येथे पथदर्शी प्रकल्प (Pilot Project) राबविण्यात येईल.

३. सदर प्रकल्पाकरीता होणारा खर्च खालील नमूद लेखाशिर्षात उपलब्ध असलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक एस-०१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१ - नागरी आरोग्य सेवा - विषमचिकित्सा राज्य योजनेंतर्गत योजना

(००) (०९) - वैद्यकीय महाविद्यालये व संलग्न रुग्णालयात आरोग्य सेवा

३० - इतर कंत्राटी सेवा (२२१० डी ९६२)

४. सदर प्रकल्पाबाबत आवश्यकतेनुसार शासन निर्णय/ आदेश वेळोवेळी स्वतंत्र्यपणे निर्गमित करण्यात येतील.

५. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१४१९०४००३८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2025.02.14 19:04:42 +05'30'

**(म. गि. जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मंत्री (वै. शि.) यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव (वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. सचिव (माहिती व तंत्र विभाग), सामान्य प्रशासन विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष संचालनालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) ½, महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
६. C-DAC, नवी दिल्ली.
७. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
८. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
९. सर्व अधिष्ठाता/वैद्यकीय अधिक्षक, शासकीय वैद्यकीय/ दंत/आयुर्वेद/ होमिओपॅथी / परिचर्या महाविद्यालय.
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. निवडनस्ती (प्रशासन-२)